मा. सर्वोच्च / उच्च न्यायालयात अपिल दाखल करणे संदर्भात निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली गठित करावयाच्या उच्चाधिकार समितीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१५/व्यय-१२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. १३ जुलै, २०२३

**प्रस्तावना-**

राज्य शासनाचे प्रशासकीय विभाग व त्यांच्या अखत्यारित कार्यरत क्षेत्रीय कार्यालयांमध्ये विविध न्यायालयीन प्रकरणे न्यायप्रविष्ठ असतात. अशा न्यायालयीन प्रकरणी शासनाच्या विरुद्ध निकाल लागल्यास त्या प्रकरणी प्रचलीत कार्यपध्दतीनुसार संबंधित मुख्य सादरकर्ता अधिकारी/सरकारी वकील यांचे अभिप्राय घेवून विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल करणे संदर्भात कार्यवाही करण्यात येते.

न्यायालयीन प्रकरणी वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात येणारे अपील केवळ औपचारिकता म्हणून दाखल न करता, सदर प्रकरणांची गुणवत्ता विचारात घेवून दाखल करणे आवश्यक आहे. अपील दाखल केल्यावर न्यायालयीन प्रकरणी होणारा खर्च अनेकदा संबधित याचिकेत अंतर्भूत आर्थिक बाबींपेक्षा खूप मोठा असतो. काही प्रकरणी अपीलाचा निकाल शासन विरोधात गेल्यास मूळ दाव्यात नमूद असलेली बाब/ देय रक्कम यापेक्षा कितीतरी अधिक रक्कम व्याजाच्या स्वरुपात राज्य शासनाला याचिकाकर्त्यास अदा करावी लागते. उदा. भूसंपादन प्रकरणे,लवाद प्रकरणे, थकित देयके इत्यादी. सबब मोठया प्रमाणावर आर्थिक भार असणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी राज्य शासनातर्फे करावयाच्या अपीलांबाबत व्यवहार्य निर्णय घेण्यासाठी एक उच्चाधिकार समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१. मा. सर्वोच्च/ उच्च न्यायालयात मोठया प्रमाणावर आर्थिक भार असणाऱ्या प्रकरणांमध्ये अपिल दाखल करणे संदर्भात निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाधिकारी /अधिकाऱ्यांचे पदनाम | धारण केलेले पद |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, विधी व परामर्शी | निमंत्रीत सदस्य |
| ५ | न्यायालयीन प्रकरणाशी संबंधित प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव | सदस्य सचिव |

२. उच्चाधिकार समितीची कार्यपद्धती खालीलप्रमाणे राहील. -

२.१ संबंधित प्रशासकीय विभाग न्यायालयीन प्रकरणी वरिष्ठ न्यायालयात अपिल करणेसंदर्भात प्रथमत: विहीत कार्यपद्धतीनुसार संबंधित मुख्य सादरकर्ता अधिकारी/शासकीय वकीलांचे अभिप्राय घेतील. तद्नंतर प्रकरणाची गुणवत्ता विचारात घेवून विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने ते प्रकरण उच्चाधिकार समितीसमोर सादर करावयाच्या आवश्यकतेबाबतच्या सविस्तर कारणमिमांसेसह बैठक आयोजित करण्यासाठी समितीच्या अध्यक्षांकडून दिनांक व वेळ प्राप्त करून घेतील.

२.२ उच्चाधिकार समिती विचाराधीन न्यायालयीन प्रकरणाचा त्यात समाविष्ट कायदेशीर, आर्थिक, अपीलांची व्यवहार्यता, इत्यादीं बाबींचा प्रकरणाच्या गुणवत्तेनुसार सर्वंकष विचार करून अपील दाखल करण्यासंदर्भात निर्णय घेईल.

२.३ उच्चाधिकार समितीने संबंधित न्यायालयीन प्रकरणी घेतलेला निर्णय प्रशासकीय विभाग त्यांचे प्रभारी मंत्री महोदयांच्या निदर्शनास आणतील.

२.४ उच्चाधिकार समितीसमोर सादर करण्यात येणाऱ्या प्रकरणांबाबत संबंधित प्रशासकीय विभाग बैठकीचे आयोजन/ बैठकीच्या सुचना/ बैठकीचे इतिवृत्त तयार करणे इत्यादी कार्यवाही करेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१३१२३८०८६४०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY DATTATRAYA SHINDE

Digitally signed by VIJAY DATTATRAYA SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=8d581ef6f28f20d8264faa9bfbdc369f04ef3e0ca7b45b7276f2b2f4ed683d3c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D744AB8F2AEDD786E4ACF89A52D8CB228F3424F1BBB8BB414195601BBDF9F6A5, cn=VIJAY DATTATRAYA SHINDE
Date: 2023.07.13 15:01:50 +05'30'

**( वि. द. शिंदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१३. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन मुंबई
१४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
१५. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), मुंबई /नागपूर
१६. सर्व सह सचिव /उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन व्यय-१२ संग्रहार्थ.